जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे व या कार्यालयाच्या अधिनस्त सात संबंधित कार्यालये पुणे महानगर परिवहन महामंडळ लि. पुणे या नवीन जागेत स्थलांतरित करण्यास व जागेचे भाडे अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**

**शासन निर्णय, क्रमांक : नजाभा-२०२३/प्र.क्र.५०/२२-स**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई ४०००३२

दिनांक:- १६ एप्रिल, २०२४

वाचा:- १) शासन निर्णय, समक्रमांक दिनांक १९ जुन, २०२३, दिनांक १० नोव्हेंबर, २०२३ व दिनांक २३ फेब्रुवारी, २०२४.

२)सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांचे पत्र जा.क्र.स.आ./संवका-१५/ जिविलेपवर्ग-१/जागास्थलांतर/१७५/२०२४, दि.२१/०३/२०२४.

**प्रस्तावना :-**

वाचा क्र.१ येथील सर्व शासन निर्णय या निर्णयान्वये अधिक्रमीत करण्यात येत आहे.

विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था(लेखापरीक्षण), पुणे या कार्यालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे व अधिनस्त ७ कार्यालय सद्यस्थितीत भूविकास बँक, मार्केटयार्ड, पुणे यांच्या इमारतीत भाडयाने कार्यरत आहे. भूविकास बँकेने पुणे जिल्हा सहकारी कृषी व ग्रामीण बहुउद्देशीय विकास बँक मर्या. पुणे यांची जागा ही पुणे जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेस विक्री केली असल्याने सदर जागा सोडणेसाठी सतत तगादा लावत आहे. त्यामुळे भूविकास बँकने जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे यांच्याबरोबर दि.३१/०५/२०२३ पर्यंतच करार केला आहे. श्री.जितेंद्र कन्हैयालाल नवासकर/श्री.गिरीश रुपचंद गादिया, अशोका प्लाझा, युनिट क्र.५०१, ५ वा मजला, विमान नगर, पुणे येथील नविन जागेत जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, पुणे व इतर संलग्न ७ कार्यालये स्थलांतरीत करण्यास व जागेचे भाडे संबंधित घरमालकास अदा करण्याबाबत दि.१९.०६.२०२३ च्या शासन निर्णया अन्वये विभागाने प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान केली होती. तथापि, राज्य सरकारी कर्मचारी मध्यवर्ती संघटना व महाराष्ट्र स्टेट को. ऑप डिपार्टमेंट ऑडीटर्स असोसिएशन, नागपूर यांनी निवदेनाद्वारे शासनास जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे व अधिनस्त ७ कार्यालये विमान नगर, पुणे येथील नवीन जागा गैरसोयीची असल्याने सदर जागेत स्थलांतरीत न

करता मे.ढोणे ॲग्रो एजन्सी, जागा मालक श्री. संतोष दत्तात्रय ढोणे यांच्या प्लॉट नं. इ-५, हमाल भवन शेजारी, मार्केट यार्ड, पुणे येथील पाच मजली इमारतीस एकूण १०८७० चौ.फूट एवढी असून तळमजला पार्किग व लिफ्ट सुविधेसह रु.६०/- चौ.फुट या कमाल दराने (पुणे मनपा कर व सोसायटी देखभाल शुल्कासह) किंवा सार्वजनिक बांधकाम विभागाने प्रमाणित केलेला दर यापैकी जो दर कमी असेल त्या दराने नवीन जागेत स्थलांतरीत करण्यास व भाडे संबंधित घरमालकास अदा करण्यास शासनाने दि.१०/११/२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्व्ये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात आली आहे. सदर शासन निर्णय दि.१०/११/२०२३ मध्ये नमूद कलेलो मेसर्स ढोणे ॲग्रो एजन्सी इ-५ मार्केटयार्ड याची जागा सदयस्थितीत उपलब्ध नसल्याचे दिसून येते, असे जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, पुणे यांनी दि.०१/१२/२०२३ रोजीच्या पत्रान्वये कळविलेले आहे. त्यानुसार जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे व अधिनस्त ७ कार्यालय श्री.जितेंद्र कन्हैयालाल नवासकर/श्री.गिरीश रुपचंद गादिया, अशोका प्लाझा, युनिट क्र.५०१, ५ वा मजला, विमान नगर, पुणे येथील नविन जागेत जिल्हा विशेष लेखापरिक्षक (वर्ग-१), सहकारी संस्था, पुणे व इतर संलग्न ७ कार्यालये स्थलांतरीत करण्यास दि.२३/०२/२०२४ रोजीच्या शासन निर्णयान्वये विभागाने प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान केली आहे. राज्य सरकारी गट-ड (चतुर्थ श्रेणी) कर्मचारी मध्यवर्ती महासंघ यांनी निवेदनाव्दारे जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे हे कार्यालय व इतर संबंधित कार्यालये श्री जितेंद्र कन्हैयालाल नवासकर / गिरिध रुपचंद गादिया यांच्या मालकीची विमाननगर, पुणे येथील रु.६०/- प्रति चौरस फुट दराने नवीन जागेत स्थलांतरीत करण्यास देण्यात आलेली मान्यता रद्द करण्याची विनंती करुन पुणे महानगर परिवहन (पीएमटी) यांची स्वारगेट येथील जागेचा उपलब्ध असल्याबाबत कळविलेले आहे.त्यानुसार जिल्हा विशेष लेखापरिक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे व इतर ०७ कार्यालये ही पुणे महानगर परिवहन महामंडळ लिमिटेड, स्वारगेट यांच्या कमर्शिअल इमारत क्र.१ चौथा मजला येथे रु.३५.१७ या दराने एकूण १२३६२ चौ.फूट या नविन जागेत स्थलांतरीत करण्यास व जागेचे भाडे संबंधित घरमालकास अदा करण्यास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत सहकार आयुक्त व निबंधक, पुणे यांची संदर्भाधीन क्र.०२ च्या पत्रान्वये सादर केलेला प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय :-**

विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण), पुणे या कार्यालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे या कार्यालयाच्या अधिनस्त सात संबंधित कार्यालये पुणे महानगर परिवहन महामंडळ लिमिटेड, स्वारगेट यांच्या कमर्शिअल इमारत क्र.१ चौथा मजला येथे रु.३५.१७ या दराने एकूण १२३६२ चौ.फूट या नविन जागेत स्थलांतरीत करण्यास व जागेचे भाडे संबंधित घरमालकास अदा करण्यास खालील अटीशर्तीच्या अधीन राहून प्रशासकीय व वित्तीय मान्यता याद्वारे देण्यात येत आहे.

अटी व शर्ती :-

१) सर्व फर्नीचर/साधनसामुग्रीची नव्याने खरेदी न करता उपलब्ध आणि पूर्वी वापरात असलेला वापरणे योग्य फर्नीचर/ गॅजेट्स उदा.संगणक, प्रिंटर इत्यादि. यांचा उपयोग करणे.

२. सदर मान्यतेच्या अनुषंगाने जागा मालकासोबत रितसर करारनामा करण्यास सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३. या बाबीवर होणारा खर्च, मागणी क्रमांक व्ही-२, मुख्यलेखाशीर्ष २४२५-सहकार (००) (०१) लेखापरीक्षणासाठी कर्मचारी वर्ग (अनिवार्य) उपलेखाशिर्ष- (२४२५०२२७) यामध्ये “१४- भाडेपट्टी व कर”या उपशिर्षाखाली अर्थसंकल्पात मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील अ.क्र.१०, नियम ११५ अन्वये कार्यालयासाठी जागा भाड्याने घेण्यास व भाडे प्रदान करण्यास मंजूरी देण्याबाबत प्रशासकीय विभागाना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

५. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेतांक २०२४०४१६११३५१५६१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANKUSH PANDURANG SHINGADE

Digitally signed by ANKUSH PANDURANG SHINGADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=0619305c0a0825664efa457ffa51c3f2364841c81f8c437078a333b7111446a2, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E11F71FCAC231B0F91F430636DE14F6C49B569D173346155B9208DCD97DD078B, cn=ANKUSH PANDURANG SHINGADE
Date: 2024.04.16 11:48:26 +05'30'

**( अंकुश शिंगाडे )**

**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) मा.मंत्री (सहकार) यांचे खाजगी सचिव.
२) मा.अपर मुख्य सचिव, (सहकार व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
४) महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५) महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
६) महालेखापाल-१ (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७) महालेखापाल-२ (लेखापरिक्षण) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८) उप सचिव(अर्थसंकल्प) यांचे स्वीय सहायक, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था (लेखापरीक्षण) पुणे विभाग, पुणे
१०) जिल्हा विशेष लेखापरीक्षक वर्ग-१, सहकारी संस्था, पुणे.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
१२) निवडनस्ती २२-स.